भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील
उप अभियंता ( यां ) पदावरील तदर्थ
नियुक्त्या पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः याचिका २०१४/प्र.क्र.१९१/पापु १५**
गो.ते.रुग्णालय आवार, ७वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ०६ डिसेंबर, २०१४

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. आपना-२०१३/प्र.क्र.२४९/पापु १५, दि. ३१/७/२०१४.**

**प्रस्तावना :-**

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील उप अभियंता (यां) ही पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार ५०:५० याप्रमाणे नामनिर्देशनाने व पदोन्नतीने भरण्यांत येतात. सदर पदे रिक्त असल्याने व शासकीय कामकाज पार पाडण्यासाठी रिक्त असलेली पदे भरण्याच्या हेतूने शाखा अभियंत्यांना तदर्थ स्वरुपात उप अभियंता (यां) पदावर सन २००८ पासून पदोन्नत्या देण्यात आल्या आहेत. सदर तदर्थ स्वरुपातील पदोन्नत्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा ११ महिन्याच्या कालावधी पर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत देण्यात आल्या होत्या. सदर तदर्थ पदोन्नत्या वेळोवेळी खंड देऊन पुढे चालू ठेवण्यांत आल्या होत्या. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदांवर १६ उमेदवारांच्या शिफारशी प्राप्त झाल्यानंतर शासन निर्णय, दिनांक ३१/७/२०१४ अन्वये त्यातील १५ उमेदवारांच्या नियुक्त्या तदर्थ स्वरुपात कार्यरत असलेल्या अभियंत्यांना शाखा अभियंता या पदावर पदावनत करुन करण्यांत आल्या आहेत. सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर या अभियंत्यांनी त्यांच्या पदावनतीच्या आदेशाविरोधात मा.महाराष्ट्र प्रशासकीय

न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज दाखल केले होते. उपरोक्त अभियंत्यांनी दाखल केलेल्या मूळ अर्जाच्या सुनावणीच्या अनुषंगाने मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने खालील प्रमाणे आदेश दिलेले आहेत.

We therefore, allow these Original Applications in terms of prayer 9 (a) of the Original Applications. We direct the applicants be continued on the post of Deputy Engineer (Mechanical) as held by them on temporary basis, until after receipt of list of candidates duly selected is received and appointment orders in their favour are issued.

We clarify that notwithstanding the order of reversion if any passed, the applicants shall be continued as Deputy Engineer (Mechanical) on the same basis as indicated hereinbefore only.

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे आदेश विचारात घेऊन सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर यांच्या पदावनतीचे आदेश रद्द करुन त्यांना उपअभियंता (यां) या पदावर पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर या अभियंत्यांच्या पदावनतीबाबतचे आदेश मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.७५७, ७५८, ७५९,७६० व ७६१/२०१४ यावर दिनांक ०९/१०/२०१४ रोजी दिलेल्या आदेशानुसार याद्वारे रद्द करण्यांत येत आहेत. त्यानुसार सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर यांच्या उपअभियंता (यां) या पदावरील तदर्थ नियुक्त्या पुढे चालू ठेवण्यांस याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर यांच्या तदर्थ स्वरुपातील नियुक्त्या ह्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा उप अभियंता (यां) ही पदे नियमितरित्या भरली जाईपर्यंत किंवा ११ महिन्याच्या कालावधी पर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत सुरु ठेवण्यासही याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. श्रीमती धनश्री पाटील व श्री. संदीप गडकर यांना अनुक्रमे सातारा

व कोल्हापूर येथील उपयांत्रिकी विभागात महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून उपअभियंता म्हणून नियुक्ती देण्यात आली होती तथापि श्रीमती पाटील व श्री गडकर हे त्यांच्या नियुक्तीच्या पदी रूजू न झाल्याने त्यांची सदरहू नियुक्ती रद्द करण्याबाबतचे आदेश अलहिदा काढण्यात येतील.

सर्वश्री अे.एस.कासार, जे.बी.लाडे, अे.के.पाटील, एस.एन.सुर्यवंशी व एन.एल.लोणकर यांना खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री. ओ.एस.कासार | उप अभियंता (यां) उपविभाग, जिल्हा परिषद, कोल्हापूर |
| २ | श्री. जे.बी.लाडे | उप अभियंता (यां) उपविभाग, जिल्हा परिषद, सातारा |
| ३ | श्री. अे.के.पाटील | जिल्हा परिषद, ठाणे देखभाल व दुरूस्ती कक्षातील उपअभियंता (यां) या पदावर |
| ४ | श्री. एस.एन. सुर्यवंशी | जिल्हा परिषद, सोलापूर देखभाल व दुरूस्ती कक्षातील उपअभियंता (यां) या पदावर |
| ५ | श्री.एन.एल.लोणकर | जिल्हा परिषद, ठाणे देखभाल व दुरूस्ती कक्षातील उपअभियंता (यां) या पदावर |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०२१४३०३३८१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.12.06 16:34:52 +05'30'

(प्र. गि. कानडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे / कोकण
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे/ठाणे/कोल्हापूर/सातारा/सोलापूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ठाणे/कोल्हापूर/सातारा/सोलापूर
५. संबंधित उप अभियंते (यां) (संचालनालयामार्फत)
६. निवड नस्ती (पापु-१५)